**मा.उच्च न्यायालयाने वेगवेगळया याचिकांमध्ये दिलेल्या आदेशानुसार राज्यातील सर्व अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयातील बिगर नेट/सेट अधिव्याख्यात्यांनी विहीत मुदतीत नेट/सेट अर्हता प्राप्त करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(३५९/०९)/विशि-३
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ८ सप्टेंबर , २०१०.

वाचा:-

१) विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्र.F.1/11/87(CPP) दि.१९ सप्टेंबर, १९९१

२) विद्यापीठ अनुदान आयोगाची अधिसूचना क्रमांक F.1-1/2002 (PS) Exemp. दि.१ जून, २००९ व केंद्रशासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, राजपत्र दि.११ जुलै, २००९.

३) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(३५९/०९)/विशि-३, दिनांक १२ नोव्हेंबर, २००९.

४) विद्यापीठ अनुदान आयोगाचे सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंना पाठविलेले पत्र क्रमांक F.No. 1-1/2002 (PS) Pt file-III दि. २७ ऑगस्ट २००९.

५) शासन निर्णय क्र. संकीर्ण २००९/(४३८/०९)/विशि-३, दिनांक ३० जानेवारी,२०१०

**प्रस्तावना :** देशाची प्रगती होण्यासाठी तसेच जागतिकीकरणाच्या स्पर्धेमध्ये टिकून राहण्यासाठी नागरिकांस दर्जेदार शिक्षण मिळणे आवश्यक आहे. भविष्यातील सुज्ञ नागरिक घडविण्यामध्ये उच्च शिक्षणाचा मोलाचा वाटा आहे. त्यामुळे उच्च व तंत्रशिक्षणाचा दर्जा उंचावणे व त्याची गुणवत्ता वाढविणे अत्यावश्यक आहे. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील तरतुदीनुसार राज्यातील शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना करण्याची सर्व जबाबदारी विद्यापीठाचे कुलगुरु व त्यांचे सर्व अधिकारी यांची असते. उच्च शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोग, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद इत्यादी प्राधिकरणाकडून सुध्दा वेळोवेळी निदेश देण्यात येतात.

२. तथापि, गेल्या काही वर्षापासून असे निदर्शनास आले आहे की, एका बाजुला जागतिक स्तरावर उच्च शिक्षणाचा दर्जा वाढत असून दुसऱ्या बाजुला राज्यातील उच्च शिक्षणाचा दर्जा मात्र

घसरत आहे. याबाबत समाजातील विविध घटक व तज्ञांकडून तसेच मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखालील कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (जे.बी.व्ही.सी.) वेळोवेळी चिंता व्यक्त करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे या संदर्भात मा.न्यायालयानेही वेगवेगळया याचिकांमध्ये निर्णय देतांना चिंता व्यक्त केली आहे.

३. मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (J.B.V.C.) तसेच मा. उच्च न्यायालयाने निरनिराळया याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी व शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या स्पर्धेत राज्यातील विद्यार्थी टिकून रहावेत यासाठी योग्य ती पावले उचलण्यासाठी शासनाला व विद्यापीठांना आदेशित केलेले आहे.

४. शिक्षणाच्या गुणवत्तेमध्ये अपेक्षेप्रमाणे वाढ न होण्याची व शिक्षण क्षेत्रामध्ये घसरण होण्याच्या अनेक कारणांपैकी **राज्यातील अकृषी विद्यापीठे व सर्व महाविद्यालयामध्ये नेट / सेट अर्हताधारक अधिव्याख्यात्यांचा अभाव असणे** हे एक मुख्य कारण असल्याचे प्रकर्षाने दिसून आले आहे.

५. **अधिव्याख्याता पदासाठी अनिवार्य असलेल्या नेट / सेट परीक्षेबाबतची पार्श्वभूमी / पूर्व इतिहास -**

**५.१** विद्यापीठ अनुदान आयोगाने दि.१९ सप्टेंबर, १९९१ च्या अधिसूचनेन्वये विद्यापीठे व महाविद्यालयातील अधिव्याख्याता पदासाठी नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे ही किमान अर्हता निश्चित केली आहे व या नंतर निर्गमित केलेल्या निरनिराळया अधिसूचनेमध्ये याचा पुनरुच्चार केलेला आहे.

**५.२** राज्य शासनाने सुध्दा विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (यु.जी.सी.) निरनिराळया अधिसूचना राज्यात लागू करुन नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य केलेले आहे. तसेच राज्य शासनाने पाचव्या वेतन आयोगाच्या संदर्भात निर्गमित केलेल्या दि.११.१२.१९९९ च्या शासन निर्णयामध्ये सुध्दा अधिव्याख्याता पदासाठी नेट /सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असल्याचा पुनरुच्चार केलेला आहे.

**५.३** सन १९९१-१९९९ या कालावधीत नियुक्त झालेल्या अधिव्याख्यात्यांना नेट-सेट परीक्षा अनिवार्य नाही अशी काही संघटनांनी भूमिका मांडली होती. त्यांनी दिलेली निवेदने, इत्यादी बाबींचा विचार राज्य मंत्रिमंडळाने सन २००१ मध्ये नव्याने केला व सर्व अधिव्याख्यात्यांना सन १९९१ पासून नेट-सेट परीक्षा उत्तीर्ण असणे अनिवार्य आहे असा स्पष्ट निर्णय दिनांक २९

निरनिराळया याचिका दाखल झाल्या. (उदा. याचिका क्र.५०२२/२००१ दि.१५/१८/२० फेब्रुवारी,२००२, याचिका क्र.५३७५/२००१, याचिका क्र.५७८२/२००१ व याचिका क्र.४२६६/२००६, दि.२७.११.२००८ ) सदर याचिकांमध्ये अंतिम आदेश देताना मा.उच्च न्यायालयाने पुढील बाबी स्पष्ट केल्या आहेत :-

(ii) शासनाने दि.१८.१०.२००१ रोजी निर्गमित केलेला शासन निर्णय वैध आहे.

(ii) सन १९९१ पासून अधिव्याख्याता पदासाठी नेट / सेट परीक्षा अनिवार्य आहे.

(iii) सन १९९१ ते १९९९ या कालावधीत ज्या बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांची नियुक्ती करण्यांत आलेली आहे त्यांनी डिसेंबर, २००३ पर्यन्त नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास त्यांना सेवेतून काढून टाकण्यात यावे.

**५.५** मा.उच्च न्यायालयाचे वरीलप्रमाणे स्पष्ट आदेश असतानाही सन १९९१-१९९९ या कालावधीतील नियुक्त झालेल्या अधिव्याख्यात्यांना नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य नसल्याचा मुद्दा पुन्हा उपस्थित करुन शिक्षकांच्या एमफुक्टो या संघटनेने दि.१४ जुलै ते २६ ऑगस्ट २००९ पर्यन्त ( ४४ दिवसांचा) संप पुकारला होता. **या संदर्भात सदर संघटनेशी शासन स्तरावरुन अनेकवेळा झालेल्या चर्चेअंती या कालावधीतील अधिव्याख्यात्यांना नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असल्याचे स्पष्ट करण्यात आले.** त्याप्रमाणे दि.२६ ऑगस्ट,२००९ च्या बैठकीच्या इतिवृत्तामध्ये स्पष्ट उल्लेख करण्यांत आलेला आहे.

६. आता, विद्यापीठ अनुदान आयोगाने दि.२७ ऑगस्ट, २००९ च्या पत्रान्वये व दि.२३ सप्टेंबर, २००९ रोजीच्या अधिसूचनेन्वये तदर्थ, इ.स्वरुपात कार्यरत असलेल्या बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांनी दोन वर्षाच्या कालावधीतील प्राप्त होणाऱ्या चार संधीत नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य असल्याचे आदेशित केले आहे. त्या अनुषंगाने दि.३० जानेवारी,२०१० रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे.

७. मा.उच्च न्यायालयाचे वरील सर्व निर्णय व विद्यापीठ अनुदान आयोगाची (यु.जी.सी.) भूमिका विचारात घेता शासन स्तरावरुन आवश्यक ते आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. **बिगर नेट/ सेट अधिव्याख्यात्यांना दोन वर्षात चार संधीत नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे व**

८. (i) अधिव्याख्याता पदासाठी नेट /सेट अर्हता असणे अनिवार्य आहे.

(ii) विद्यापीठ अनुदान आयोगाच्या संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील अधिसूचनेन्वये व संदर्भाधीन अनुक्रमांक ५ येथील दि.३० जानेवारी , २०१० च्या शासन निर्णयामधील तरतुदी नुसार सर्व बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांनी दि.३१.१२.२०११ पर्यन्तच्या या दोन वर्षाच्या कालावधीतील प्राप्त होणाऱ्या चार संधीत नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

९. (i) संबंधीत विद्यापीठाने त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व महाविद्यालयातील सर्व बिगर नेट / सेट अधिव्याख्यात्यांना मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.५०२२/२००१ मधील दि.१५/१८/२० फेब्रुवारी, २००२ रोजी दिलेले आदेश व विद्यापीठ अनुदान आयोगाचे संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील आदेश वैयक्तिकरित्या लेखी नोटीशीद्वारे अवगत करावेत.

(ii) अशा स्वरुपाची नोटीस सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत संबंधीत सर्व अधिव्याख्यात्यांना पोहोचेल याची विद्यापीठाने दक्षता घ्यावी.

(iii) त्यानंतर विद्यापीठाने अशा सर्व अधिव्याख्यात्यांची महाविद्यालय निहाय यादी तयार करावी व संचालकांकडे तसेच पुणे विद्यापीठाकडे त्वरीत पाठविण्याची व्यवस्था करावी.

१०. विद्यापीठांनी त्यांच्याशी संलग्नित असलेल्या महाविद्यालयातील सर्व अधिव्याख्यात्यांचा वेळोवेळी आढावा घ्यावा आणि जे बिगर नेट / सेट अधिव्याख्याते आहेत त्यांना नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी आवश्यक ते प्रशिक्षण वर्ग घेऊन प्रोत्साहित करावे व जास्तीत जास्त अधिव्याख्याते नेट / सेट परीक्षा उत्तीर्ण होतील यासाठी आवश्यक ते सर्वतोपरी उपाययोजना करावी. या बाबतीत सविस्तर सूचना सर्व कुलगुरुंसोबत दि.१८.६.२०१० च्या बैठकीत देण्यात आल्या आहेत.

११. दि.३१ डिसेंबर, २०११ नंतर बिगर नेट / सेट अधिव्याख्याते ज्या महाविद्यालयात कार्यरत असल्याचे दिसून येईल, त्या महाविद्यालयाचे असंलग्नीकरण करण्याची कार्यवाही संबंधीत विद्यापीठाने त्वरीत करावी.

१२. संबंधीत विद्यापीठाने वरीलप्रमाणे असंलग्नीकरणाची कार्यवाही न केल्यास त्या विद्यापीठा विरुध्द शासन स्तरावरुन कार्यवाही करण्यात येईल.

१३.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक **२०१००९०८२००९२९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

(रा.गो.जाधव)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री ,(उवतंशि), यांचे खाजगी सचिव
५) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
६) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
७) परिक्षा नियंत्रक, सर्व अकृषी विद्यापीठे
८) सर्व संचालक, विद्यापीठ व महाविद्यालय विकास मंडळ,
९) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
११) सर्व सहसचिव /उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी , उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१२) निवड धारिका विशि-३

Desktop\g.r\Net-Set compulsory (with termination).doc